**वर्कप्लॅन अंतर्गत सन २०१०-११ मध्ये ऊस विकास कार्यक्रम ही**
**केंद्र पुरस्कृत योजना राबविण्याकरिता वित्तीय मान्यता देणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- उवियो १६१०/प्र.क्र.१८९/४-अे**
**मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२**
**दिनांक : १३ सप्टेंबर,२०१०**

**संदर्भ :-१)** मॅक्रो मॅनेजमेंट ॲग्रीकल्चर (MMA) स्कीम संदर्भात केंद्र शासनाच्या जूलै २००८ मध्ये निर्गमित झालेल्या सुधारीत मार्गदर्शक सूचना

**२)** केंद्र शासनाचे पत्र क्र.६-३/२०१० एमएम, दिनांक ११ जून,२०१० व दि.१६ जून, २०१०.

**३)** शासन निर्णय समक्रमांक दिनांक २८ जून,२०१०.

**४)** कृषि आयुक्तालयाची पत्रे क्रमांक:नपि /उवियो/शासन निर्णय/विप्र -३/२३८व २५३/१० अनुक्रमे, दिनांक २४/६/२०१० व दि.१९/७/२०१०.

**प्रस्तावना :-** केंद्र शासनाने संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये सन २०१०-११ मध्ये केंद्र पुरस्कृत ऊस विकास कार्यक्रम राबविण्याकरिता रु.२०५१.२८ लाखाच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता दिली आहे. यामध्ये केंद्र व राज्य हिस्सा ७५:२५ नुसार अनुक्रमे रु.१५३८.४६ (रुपये पंधरा कोटी अडतीस लाख सेहेचाळीस हजार फक्त) व रु.५१२.८२ लाख (रुपये पाच कोटी बारा लाख ब्याऐंशी हजार फक्त) असा आहे. केंद्र शासनाची मान्यता विचारात घेऊन केंद्र पुरस्कृत ऊस विकास कायक्रम राबविण्याकरिता रु.२०५१.२८ लाखाच्या कार्यक्रमास संदर्भाधिन अनु.क्र.३ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

केंद्र शासनाने वर्कप्लॅन अंतर्गत सदरहू योजने करिता त्यांच्या संदर्भाधिन दि.१६.६.२०१० च्या पत्रान्वये मुक्त केलेल्या रु.२००.०० लाख निधीच्या कार्यक्रमास वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०१०-११ मध्ये ऊस विकास कार्यक्रम ही केंद्र पुरस्कृत योजना राबविण्याकरिता केंद्र शासनाची मान्यता विचारात घेऊन रु.२०५१.२८ लाखाच्या कार्यक्रमास संदर्भ अ.क्र.३ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

२. केंद्र शासनाने वर्कप्लॅन अंतर्गत सदरहू योजने करिता त्यांच्या संदर्भाधिन दि.१६.६.२०१० च्या पत्रान्वये मुक्त केलेल्या रु.२००.०० लाख (रुपये दोन कोटी फक्त) निधीच्या कार्यक्रमास याद्वारे शासनाची वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

३. केंद्र शासनाने Revised Macro Management of Agriculture (MMA) खाली अनुदानाची उच्चतम मर्यादा न वाढविता अनुदानाचे प्रमाण वाढविण्यास आवश्यकता भासल्यास राज्य शासनाना मुभा दिलेली आहे. सदर बाब लक्षात घेऊन त्याचप्रमाणे कृषि आयुक्तालयाच्या संदर्भाधिन अनुक्रमांक-४ येथील प्रस्तावास अनुसरून हिरवळीच्या खताचे बियाणे ही बाब राबविण्यास, शेतकरी सहभागी होण्याच्या दृष्टीने हिरवळीच्या खताचे बियाणे पुरवठयासाठी व शासनाने निश्चित केलेल्या दराच्या अधिन राहून सदर योजनेतंर्गत सुक्ष्म मुलद्रवे, परवानाधारक पुरवठादारांकडून किंवा साखर कारखान्यांमार्फत थेट खरेदी करण्यास, अनुदानाची उच्चतम मर्यादा रूपये १०००/- प्रती हेक्टर ठेवून अनुदानाचे प्रमाण २५ टक्कयावरून ५० टक्कयापर्यत वाढविण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

४. केंद्र शासनाने त्यांच्या संदर्भाधीन दि.११/६/२०१० च्या पत्रान्वये निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार सन २०१०-११ मध्ये ऊस विकास कार्यक्रम राबविण्यात यावा. या योजनेचे उद्दिष्ट गाठण्याकरिता कार्यक्रमाची बाबनिहाय भौतिक उद्दिष्टे व अनुदानाचा दर सोबतच्या परिशिष्ठात दर्शविण्यात आला आहे.

५. या कार्यक्रमांसाठी वरील मंजूर केलेला निधी खर्च करण्यास संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच मंजूर निधीचे जिल्हा निहाय वितरण करण्यास संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. त्यांनी मार्गदर्शक सूचना निर्गमित करताना उपलब्ध निधीच्या प्रमाणात भौतिक उद्दिष्ट ठेवावीत तसेच मनुष्यबळ व बैलाच्या सहाय्याने चालविण्यात येणाऱ्या प्रत्येक औजारांचा संख्येसह उल्लेख करावा. या योजनेचा खर्च मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीच्या मर्यादेत व मासिक कॅश फ्लो च्या मर्यादेत राहील याची दक्षता घेण्याची जबाबदारी संचालक(विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, पुणे यांची राहील.

६. या आदेशान्वये मंजूर केलेला निधी खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २०१०-११ च्या मंजूर तरतुदीतून भागवावा.

**मागणी क्रः- डी-३**
**२४०१- पीकसंवर्धन, १०८- वाणिज्यिक पिके,**
**( ०२ ) ( ०८ ) विदर्भ, मराठवाडा व खानदेश भागातील ऊस विकास कार्यक्रम**
**( केंद्र पुरस्कृत )**
**( २४०१ ४०५१ )**
**३३ अर्थसहाय्य (रु.२००.०० लाख)**

७. हा कार्यक्रम पुढील कार्यपध्दती अनुसरुन राबवावा :-

१ या योजनेंतर्गत प्रति शेतकरी/बाब अनुदानाची कमाल मर्यादा २५ टक्के इतके राहील.
२ लाभार्थी निवडतांना शेतकरी अनूसुचित जाती / जमाती आदिवासी जाती/जमाती, भटक्या विमुक्त जाती /जमाती संवर्गातील लाभार्थी यांना प्राधान्य देण्यात यावे व अशा लाभार्थ्यांना देण्यात आलेल्या लाभाबाबत स्वतंत्र नोंदी ठेवाव्यात.
३ मंजूर निधीपैकी अनुसुचित जाती / जमातीसाठी लोकसंख्येच्या प्रमाणात निधी खर्च करण्यात यावा
४ योजनांची अंमलबजावणी अधिक प्रभावी व परिणामकारकरित्या होण्याच्या दृष्टीने या योजनांतर्गत प्रकल्पाधारित विकास / विस्तार कार्यक्रम (Projectised Development/Extenion Approah) राबविण्यात यावा.
५ प्रत्येक जिल्हयाचा यथार्थदर्शी संशोधन व विस्तार आराखडा (S.R.E.P) मध्ये या योजनेचा अंतर्भाव गरजेनुरुप ठेवण्यात यावा.
६ या योजनेचे मुल्यमापन त्रयस्थ यंत्रणेकडून ( Third Party Evaluation) करुन घ्यावे.
७ सन २००९-१० मध्ये लाभ घेतलेल्या व २०१०-११ मध्ये वैयक्तिक लाभ दिलेल्या लाभार्थींची यादी तालुका कार्यालये/पंचायत समिती/जिल्हाधिकारी कार्यालयात लावण्यात यावीत तसेच इंटरनेटवर देखिल देण्यात यावी.
८ प्रत्येक जिल्हयाचा यथार्थदर्शी संशोधन व विस्तार आराखडा (S.R.E.P) मध्ये या योजनेचा अंतर्भाव गरजेनुरुप ठेवण्यात यावा.
९ वैयक्तिक लाभार्थी निवडताना महिला लाभार्थ्यांना प्राधान्य देण्यात यावे. असे लाभार्थी उपलब्ध नसल्यास इतर लाभार्थ्यांची निवड करण्यात यावी.

८.	केद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे या योजनेचा मासिक आर्थिक व भौतिक प्रगती अहवाल प्रत्येक महिन्याला विहित मुदतीत केंद्र शासनाला तसेच राज्य शासनाला सादर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

९.	हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१८९ /१०/व्यय-१, दिनांक १३ सप्टेंबर, २०१० नुसार तसेच, अपर मुख्य सचिव (कृषि) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

१०.	सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेब साईटवर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्रमांक **२०१००९१३१८५०४२००१** असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**(वि. मा. बिवलकर)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
संचालक (विस्तार व प्रशिक्षण) कृषि आयुक्तालय, पुणे
सर्व संचालक / सहसंचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
साखर आयुक्त , महाराष्ट्र राज्य, पुणे,
विभागीय आयुक्त (सर्व),
जिल्हाधिकारी (सर्व),
मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषद (सर्व),
व्यवस्थापकीय संचालक, कृषि उद्योग विकास महामंडळ, मर्या,आरे दुग्ध कॉलनी, गोरेगाव(पूर्व),मुंबई ६५,
सह संचालक (लेखा व कोषागारे), संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, ५ वा मजला, मंत्रालयासमोर,मुंबई,
विभागीय कृषि सहसंचालक (सर्व)
सर्व विधानमंडळ सदस्य,
सर्व अध्यक्ष जिल्हा परिषदा
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई,
ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय, सहावा मजला, विधान भवन, मुंबई-३२,
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
सामाजिक न्याय, क्रिडा व विशेष सहाय्य विभाग / आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
संशोधन संचालक सर्व कृषि विद्यापीठे
कृषि विकास अधिकारी,जिल्हा परिषद (सर्व)
मुख्य वित्त व लेखाधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
महालेखापाल महाराष्ट्र १ / २ मुंबई / नागपूर, (लेखा परिक्षा / लेखा अनुज्ञेयता)
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
वित्त विभाग, व्यय १, अर्थसंकल्प ३, मंत्रालय, मुंबई,
सर्व सह सचिव, उप सचिव, अवर सचिव, कक्ष अधिकारी, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
वसंतदादा सहकारी संस्था, मांजरी, ता. हवेली, जि. पुणे,
मा. मंत्री (कृषि), यांचे खाजगी सचिव,
मा. राज्यमंत्री (कृषि), यांचे खाजगी सचिव,
निवडनस्ती ( ४अे )

**शासन निर्णय क्र. उवियो - २०१० / प्र.क्र. १८९/ ४ अे, दिनांक १३ सप्टेंबर, २०१० चे परिशिष्ठ**

**( रूपये लाखात )**

| अ.क्र. | बाब | परिमाण | अनुदान दर | भौतिक लक्ष्य | आर्थिक तरतूद |
|---|---|---|---|---|---|
| अ | **मंजूर बाबी** | | | | |
| १ | आधुनिक तंत्रज्ञान प्रात्यक्षिके | संख्या | रू. ७५००/-प्रति ०.५० हेक्टर | ८६८० | ६५१.०० |
| २ | **बेणे उत्पादन कार्यक्रम** | | | | |
| | अ) पायाभूत बेणे उत्पादन | हेक्टर | किंमतीच्या १० टक्के जास्तीत जास्त रू. ४०००/- प्रति हेक्टर | १७०० | ६८.०० |
| | ब) प्रमाणित बेणे उत्पादन | हेक्टर | किंमतीच्या १० टक्के जास्तीत जास्त रू. २०००/- प्रति हेक्टर | १७००० | ३४०.०० |
| ३ | **मनुष्यबळ विकास कार्यक्रम** | | | | |
| | अ) अधिकारी/ कर्मचारी प्रशिक्षण | संख्या | रू. ३३३००/- प्रति वर्ग / ५० प्रशिक्षाणार्थी/ ३ दिवस | २४० | ४८.०० |
| | ब) शेतकऱ्यांच्या शेती शाळा | संख्या | रू१७०००/- प्रति शेती शाळा / ३० प्रशिक्षाणार्थी | २०० | ३४.०० |
| ४ | **सुक्ष्म मुलद्रव्ये पुरवठा** | | | | |
| | अ) इतर सुक्ष्म मुलद्रव्ये | हेक्टर | किंमतीच्या ५० टक्के रू.५००/- प्रति हेक्टर मर्यादेपर्यंत | ६०००० | ३००.०० |
| | ब)जिप्सम पुरवठा | हेक्टर | किंमतीच्या २५ टक्के व पूर्ण वाहतूक खर्च रू. १०००/- प्रति हेक्टर मर्यादेपर्यंत | ३००२० | ३००.२० |
| | अ) + ब) एकूण | | | | ६००.२० |
| | क) उस पिकासाठी हिरवळीचे खत / पाचट खताचा वापर | हेक्टर | किंमतीच्या ५० टक्के रू.१०००/- प्रति हेक्टर मर्यादेपर्यंत | १५००३ | १५०.०३ |
| | ड) सुधारित कृषि औजारांचा पुरवठा | नग | स्वयंचलित /पॉवर ऑपरेटेड चालणारी औजारे किंमतीच्या २५ टक्के रू. १५०००/- प्रति नग | ६६७ | १००.०५ |
| ५ | **नाविन्यपुर्ण बाब** | | | | |
| | मॉडेल फार्म/ संशोधन संस्थांना भेटी ( शेतकऱ्यांच्या सहली ) | संख्या | खर्चाच्या ५० टक्के जास्तीत जास्त रू. ५००००/- मयांदेत प्रति सहल ( ४० शेतकरी ) | १२० | ६०.०० |
| | **एकूण** | | | | **२०५१.२८** |
| | | | | **केंद्र हिस्सा** | **१५३८.४६** |
| | | | | **राज्य हिस्सा** | **५१२.८२** |